**मुख्यमंत्री युवा कार्य प्रशिक्षण योजनेच्या अंमलबजावणीसाठी विविध समित्या स्थापन करण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०२४/प्र.क्र.९०/व्यशि-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक : २६ जुलै, २०२४

**वाचा :-**

१) कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२४/प्र.क्र.९०/व्यशि-३ दि. ०९ जुलै, २०२४

**प्रस्तावना :-**

राज्यातील युवकांना त्यांच्या शिक्षणानंतर प्रत्यक्ष कामाचे प्रशिक्षण देवून त्यांची नोकरी मिळण्याची क्षमता (Employability) वाढविण्यासाठी "मुख्यमंत्री युवा कार्य प्रशिक्षण योजना" सन २०२४-२५ या आर्थिक वर्षापासून सुरु करण्यास शासन निर्णय दि.०९.०७.२०२४ अन्वये मान्यता देण्यात आली आहे.

महाराष्ट्र शासनाच्या कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग आणि मुख्यमंत्री जन-कल्याण कक्ष यांच्यामार्फत संयुक्तपणे मुख्यमंत्री युवा कार्य प्रशिक्षण योजना राबवली जाणार आहे. या उपक्रमांर्तगत तयार केलेल्या संकेतस्थळाच्या माध्यमातून रोजगार इच्छुक उमेदवार आणि रोजगार उपलब्ध करून देणारे उद्योजक जोडले जातील. रोजगार इच्छुक उमेदवारांना प्रत्यक्ष कामाचा अनुभव प्रशिक्षणातून मिळून त्यांची क्षमतावाढ होईल तसेच उद्योजकांना त्यांच्या उद्योगासाठी आवश्यक असणारे मनुष्यबळ कार्य प्रशिक्षण योजनेद्वारे उपलब्ध करून देण्यात येईल. आस्थापना/उद्योगामध्ये सध्याच्या मनुष्यबळावर आधारित सुमारे १० लाख कार्य प्रशिक्षणच्या संधी प्रत्येक आर्थिक वर्षात या योजनेच्या माध्यमातून उपलब्ध होतील. प्रति वर्षी १० लाख कार्यप्रशिक्षणार्थी यांना या योजनेचा लाभ मिळवून देण्यासाठी या योजनेची प्रभावीपणे अंमलबजावणी होणे आवश्यक आहे. यासाठी मा.मुख्यमंत्री महोदयांच्या सूचनेनुसार या योजनेच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी विविध समित्या गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मुख्यमंत्री युवा कार्य प्रशिक्षण योजना अधिकाधिक लोकाभिमुख करण्यासाठी आणि महाराष्ट्रातील सर्व स्तरापर्यंत पोहोचण्यासाठी विद्यार्थी शिक्षणाच्या प्रकारानुसार/विविध आस्थापनेनुसार/भौगोलिक कार्यक्षेत्रानुसार खालीलप्रमाणे समिती गठीत करण्याचा निर्णय घेण्यात येत आहे.

| अ.क्र. | शिक्षणाचा प्रकार/विभाग/भौगोलिक कार्यक्षेत्र | समितीचे अध्यक्ष | समितीचे सदस्य |
|---|---|---|---|
| १. | आय टी आय/व्यवसाय शिक्षण | आयुक्त, कौशल्य, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय | १. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय<br>२. संचालक, महाराष्ट्र राज्य व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण मंडळ<br>३. सेक्टर स्किल कौन्सिलचे प्रतिनिधी |

| | | | |
|---|---|---|---|
| | | | ४. राष्ट्रीय कौशल्य विकास महामंडळचे प्रतिनिधी<br>५. उपायुक्त, कौशल्य विकास रोजगार व उद्योजकता आयुक्तालय- सदस्य सचिव<br>६. औद्योगिक आस्थापनांचे प्रतिनिधी |
| २. | तंत्र शिक्षण | संचालक, तंत्रशिक्षण | १. तंत्रशिक्षण विद्यापीठाचे प्रतिनिधी<br>२. अभियांत्रिकी महाविद्यालयांचे २ प्रतिनिधी<br>३. सहसंचालक, तंत्रशिक्षण संचलनालय - सदस्य सचिव<br>४. औद्योगिक आस्थापनांचे प्रतिनिधी |
| ३. | उच्च शिक्षण | संचालक, उच्च शिक्षण | १. विद्यापीठाचे कुलसचिव<br>२. सहसंचालक, उच्च शिक्षण- सदस्य सचिव<br>३. महाविद्यालयांचे २ प्रतिनिधी<br>४. राष्ट्रीय सेवा योजनेचे राज्य समन्वयक |
| ४. | कृषी शिक्षण | महासंचालक | १. कृषी विज्ञान केंद्र (राज्य नोडल अधिकारी)<br>२. कृषी विद्यापीठाचे अधिष्ठाता (डीन)<br>३. संचालक, निविष्ठा व गुणनियंत्रण<br>४. कृषी विषयक उद्योग संघटनाचे ५ प्रतिनिधी<br>५. कृषी महाविद्यालयांचे प्रतिनिधी<br>६. उपसंचालक, महाराष्ट्र कौंसिल ऑफ ॲग्रिकल्चर रिसर्च- सदस्य सचिव |
| ५. | वैद्यकीय शिक्षण | आयुक्त, वैद्यकीय शिक्षण | १. कुलसचिव, महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ<br>२. नर्सिंग महाविद्यालये/पॅरामेडीक महाविद्यालये यांचे प्रतिनिधी<br>३. प्रशासक फिजीओ थेरेपी/ ऑक्युपेशनल थेरेपी कौंसिल<br>४. संचालक वैद्यकीय शिक्षण<br>५. संचालक नर्सिंग बोर्ड- सदस्य सचिव |
| ६. | उद्योग | विकास आयुक्त | १. सहसंचालक, उद्योग<br>२. मु.का.अ. महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळचे प्रतिनिधी |

| | | | |
|---|---|---|---|
| | | | ३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य लघु उद्योग विकास महामंडळ<br>४. आयुक्त वस्तु व सेवाकर यांचे प्रतिनिधी<br>५. महाराष्ट्र राज्य प्रदुषण नियंत्रण मंडळाचे प्रतिनिधी<br>६. आयुक्त वस्त्रोद्योग यांचे प्रतिनिधी<br>७. व्यवस्थापकीय संचालक हातमाग महामंडळ<br>८. उपआयुक्त विकास सदस्य- सचिव |
| ७. | कामगार विभाग | कामगार आयुक्त | १. संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय<br>२. मुख्य कार्यकारी अधिकारी, इमारत व बांधकाम कामगार कल्याण मंडळ<br>३. उद्योग आस्थापनाचे प्रतिनिधी<br>४. अतिरिक्त आयुक्त (कामगार) कोकण विभाग<br>५. अतिरिक्त आयुक्त माथाडी - सदस्य सचिव |
| ८ | सहकार विभाग | आयुक्त सहकार | १. आयुक्त साखर यांचे प्रतिनिधी<br>२. सहकार/साखर आयुक्त यांचे प्रादेशिक प्रमुख<br>३. सहकार उद्योगांचे/ प्रतिनिधी<br>४. सहकारी बँकाचे प्रतिनिधी |
| ९ | महानगरपालिका | आयुक्त महानगरपालिका | १. अतिरिक्त आयुक्त<br>२. उपायुक्त प्रशासन |
| १० | जिल्हा परिषद | मुख्यकार्यकारी अधिकारी | १. अतिरिक्त मुख्यकार्यकारी अधिकारी<br>२. उप मुख्यकार्यकारी अधिकारी (सामान्य) |

२. उपरोक्त गठीत समितीच्या जबाबदाऱ्या खालीलप्रमाणे असतील.

२.१ मुख्यमंत्री युवा कार्यप्रशिक्षण योजनेची प्रभावी अंमलबजावणी करणे.

२.२ समितीने आपल्या कार्यक्षेत्रातील आस्थापनांशी संपर्क करुन उपलब्ध कार्यप्रशिक्षण संधी संकलित करणे. त्यांना कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यात विभागाच्या www.rojgar.mahaswayam.gov.in या संकेतस्थळावर नोंदणी करण्यास प्रवृत्त करणे.

२.३ या कार्यप्रशिक्षण संधीसाठी शैक्षणिक पात्रतेनुसार पात्र उमेदवारांची मागणी कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालयाकडे त्यांच्या संकेतस्थळावर नोंदणीकृत उमेदवारामधून करणे.

२.४ उमेदवारांना उपलब्ध संधीशी जोडून त्यांना कार्यप्रशिक्षणासाठी संबंधित आस्थापनांमध्ये रुजू करुन घेणे.

२.५ वरील समित्यांमध्ये संबंधित समिती प्रमुख यांना आवश्यक वाटल्यास योग्य त्या संस्थांचे प्रतिनिधी निमंत्रित सदस्य म्हणून घेता येतील. योजनेच्या अंमलबजावणीसाठी ज्यांचे योगदान घेणे आवश्यक आहे त्या सर्वांचे योगदान घेण्यात यावे.

वरील समितीची बैठक दर आठवडयाला घेण्यात यावी व जास्तीत जास्त नोंदणीकृत उमेदवारांना प्रशिक्षणाच्या संधी उपलब्ध करुन देण्यात यावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०७२६१४५८०३४७०३ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MANOJ
DATTATRAY
JADHAV

Digitally signed by MANOJ DATTATRAY JADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=a83fc829949e9b1a022b031436c946028b48d51f5a1bf36ca3ce4fead857da72, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2766AFDA86350272237DCF9A191545970F7F12E66D0605C664CA2BF0F3001DC0, cn=MANOJ DATTATRAY JADHAV
Date: 2024.07.26 15:14:25 +05'30'

**( मनोज जाधव )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, यांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
४. मा. मंत्री (सर्व) यांचे खासगी सचिव, मंत्रालय मुंबई-३२
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
६. सचिव, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
७. अमुस/प्र.स./सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
८. अमुस/प्र.स./सचिव (उद्योग), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
९. अमुस/प्र.स./सचिव, वैद्यकीय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. अमुस/प्र.स./सचिव, सहकार विभाग, मंत्रालय, मुंबई
११. अमुस/प्र.स./सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. अमुस/प्र.स./सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय, मुंबई
१४. निवड नस्ती (व्यशि-३)